राज्यातील कृषी पंप ग्राहकांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (समायोजन) सन २०२१-२२.

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क.५०/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ नोव्हेंबर, २०२१

**संदर्भ** :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पूरक- २०२१/प्र.क्र.७८/अर्थ-३, दि. २०जुलै, २०२१.
४) महावितरण कंपनीचे पत्र क्र. मु.अ.(वा)शासन/वीजदर सवलतीपोटी निधी/०२२२२०, दि.२१ सप्टेंबर, २०२१.

**प्रस्तावना** :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादितकडून वीज दरात सवलत देण्यात येते व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून महावितरण कंपनीस केली जाते. महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीस कृषि पंप ग्राहकांना अर्थसहाय याकरिता वित्तीय वर्ष २०२१-२२ मध्ये मागणी क्रमांक के-६ मुख्य लेखाशिर्ष २८०१५५७२ या लेखाशीर्षाखाली रू.५३००.०० कोटीची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. त्यामधून रु. ३६१.०० कोटी रक्कम दिनांक २९ जुन, २०२१ च्या आदेशान्वये समायोजित करण्यात आली आहे. आता वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार रु. २९२७.७४ कोटी रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीस समायोजनाने उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

कृषीपंप ग्राहकांना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेल्या अनुदानाच्या रक्कमेपैकी रु.२९२७.७४ कोटी (रुपये दोन हजार नऊशे सत्तावीस कोटी चौऱ्याहत्तर लाख फक्त) रोखीने वितरीत न करता समायोजनाने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणीक्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०१) कृषीपंप ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५५७२), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. समायोजनाने वितरीत करावयाची रक्कम रु.२९२७.७४ कोटी (रुपये दोन हजार नऊशे सत्तावीस कोटी चौऱ्याहत्तर लाख फक्त) महावितरण कंपनीस रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महावितरण कंपनी मर्या., यांच्याकडून शासनास येणे असलेल्या रक्कमेपोटी वसूल करण्यात यावी व खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली समायोजनाव्दारे जमा करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्षे |
|---|---|---|---|
| १) | वित्तीय वर्ष २०२०-२१ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (ऑक्टो, २०२० ते डिसेंबर, २०२० पुर्णत:) (१३६३.७७३८४४-३५०.०० =१०१३.७७३८४४) | १३६३,७७,३८,४४०/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (००४३००९२) |
| २) | वित्तीय वर्ष २०२०-२१ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (जाने, २०२१ ते मार्च, २०२१ अंशत:) (१८२१.४३-१५६३.९६६१५६ =२५७.४६) | १५६३,९६,६१,५६०/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (००४३००९२) |
| | **एकूण** | **२९२७,७४,००,०००/-** | |

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात वरील विवरणपत्रानुसार सदर रक्कम रु.२९२७.७४ कोटी (रुपये दोन हजार नऊशे सत्तावीस कोटी चौऱ्याहत्तर लाख फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

५. सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल, मुंबई यांच्या अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने रु.२९२७.७४ कोटी (रुपये दोन हजार नऊशे सत्तावीस कोटी चौऱ्याहत्तर लाख फक्त) सदर रकमेचे देयक तयार करण्यात येवू नये.

६. महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना उपरोक्त समायोजनाव्दारे वितरीत करावयाची रक्कम ही वित्त विभागाने मंजूर केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत आहे.

७. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २३०/२०२१/व्यय-१६, दिनांक २६.१०.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२१११२४१७५९१४२४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2021.11.24 18:01:10 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.

२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे मुंबई ४०००५१

३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, १३ वा मजला, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कुलाबा, मुंबई १

४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई ३२

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०

६) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

८) अधिदान व लेखा अधिकारी,रालेवि/अराप, मुंबई ४००००१

९) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय. वांद्रे पूर्व , मुंबई ४०००५१

१०) उप सचिव (ऊर्जा-५) ,उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

११) वित्त विभाग, अर्थसंकल्प-१४, व्यय-१६, मंत्रालय, मुंबई-४०००३२

१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, ३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर मुंबई.

१३) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.